मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे, (से.नि.) अध्यक्ष, राज्य
ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई
यांची सुधारित वेतन निश्चिती करणेबाबत ...

# महाराष्ट्र शासन

## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

## शासन निर्णय क्र. सुवेनि-२०१८/प्र.क्र.७१/ग्रा.सं.४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.), मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २७ जून, २०१८

**वाचा:-** १) शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१४५ (सुधा-१)/ग्रा.सं-४, दि. ६.१.२०१६
२) शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१६/८५/प्र.क्र.२० /ग्रा.सं-४, दि. ११.२.२०१६
३) महालेखापाल (ले.व ह.)-II महाराष्ट्र नागपूर यांचे पत्र क्र.CC Cell/HCJ/OC-०१/ २०१५- १६/२४ दिनांक २०.०४.२०१८

**शासन निर्णय:-**

मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे, (सेवानिवृत्त न्यायमूर्ती) उच्च न्यायालय, मुंबई यांची राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्ष पदावर संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे. त्यांची नियुक्ती ५ वर्षासाठी किंवा त्यांच्या वयाच्या ६७ वर्ष पूर्ण होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंतच राहील.

०२. मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे, हे मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्ती पदावरुन दिनांक १९.०९.२०१५ रोजी (म.नं.) नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त झाले. त्यावेळी त्यांचे अंतिम वेतन रु.८०,०००/- इतके होते. महालेखापाल, मुंबई यांनी श्री.ए.पी.भंगाळे यांना सदर पदावर रु.४०,०००/- एवढे निवृत्तीवेतन निश्चित केले होते. त्यानुसार महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १५७ (२) (डी)(दोन) मधील अटींच्या अधीन राहून संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.४०,०००/- अध्यक्ष, राजय आयोग या पदासाठीचे वेतन निश्चित करण्यात आले होते.

०३. मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे यांचे निवृत्तीवेतनात महालेखापाल (लेखा व हकदारी)-II नागपूर यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये सुधारणा केली आहे. त्यानुसार त्यांचे सुधारित वेतन रु.२,२५,०००/- इतके निश्चित करण्यात आले असून त्यांचे दिनांक १.१.२०१६ रोजीचे निवृत्तीवेतन रु.१,१२,५००/- इतके निश्चित करण्यात आले आहेत. त्याअनुषंगाने मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे यांचे सदर पदावरील रु.२,२५,०००/- इतके वेतन विचारात घेऊन महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १५७ (२) (डी)(दोन) मधील अटींच्यास अधीन राहून त्यांचे दिनांक ११.१.२०१६ पासून अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई या पदासाठीचे खालीलप्रमाणे सुधारित वेतन निश्चित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे यांचे अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदासाठीचे निश्चित करण्यात आलेले वेतन (दरमहा) | रु.२,२५,०००/- (-) |
| २. | मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे यांना मिळणारे निवृत्तीवेतन (दरमहा) | रु.१,१२,५००/- |
| ३. | पुनर्नियुक्तीनंतर निश्चित होणारे वेतन (दरमहा) | रु.१,१२,५००/- |
| | | (रुपये एक लक्ष बारा हजार पाचशे फक्त) |

०४. मा.न्या.श्री.भंगाळे यांचे वरीलप्रमाणे निश्चित करण्यात आलेलया वेतनास प्रचलित नियमानुसार आवश्यक देय भते अनुज्ञेय राहतील. परंतु, पुनर्नियुक्तीच्या कालावधीतील त्यांना निवृत्तीवेतनावर मिळणारी महागाई भत्यावरील वाढ अनुज्ञेय राहणार नाही.

०५. मा.न्या.श्री.भंगाळे यांनी दिलेल्या वचनपत्रानुसार चुकीच्या वेतन निश्चितीमुळे किंवा भविष्यात वेतन निश्चितीमध्ये विसंगती आढळून आल्यामुळे वेतन व अनुषंगिक भत्यांची रक्कम अतिप्रदान झाल्याचे निदर्शनास आल्यास त्याची वसूली भविष्यात प्रदान करण्यात येणा-या वेतनाच्या रकमेतून किंवा इतर प्रकारे आवश्यक वाटल्यास निवृत्तीवेतनामधून वसूल करण्यता येईल. सुधारित वेतन निश्चितीमुळे वेतनातील फरकाबाबत आवश्यक ती कार्यवाही, प्रबंधक(प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई यांनी करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

०६. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एम-२, २४०८, अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा (०४) ग्राहक संरक्षण अधिनियम १९८६ अन्वये राज्य परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंच स्थापन करणे (०४)(०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१) ०१ वेतन, या लेखाशिर्षामधून सन २०१८-२०१९ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा .

०७. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८०६२८१५१९५७४१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.06.28 15:25:57 +05'30'

**( भा.बा.पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३) मा.मंत्री अनापुवग्रास यांचे खाजगी सचिव.
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
५) मा.राज्यमंत्री अनापुवग्रास यांचे खाजगी सचिव.
६) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
७) प्रधान सचिव, (अ.ना.पु.व .सग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर.
९) महालेखापाल, ( ले व प ) महाराष्ट्र महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर.
१०) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
११) प्रबंधक, (प्रशासन/विधी) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
१२) मा.अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे स्विय सहायक
१४) निवडनस्ती, ग्रासं-४.